**महिला व बाल विकास विभागातील जमादार/वरिष्ठ काळजीवाहक/कनिष्ठ काळजीवाहक/वॉर्डबॉय/परिचर / स्वयंपाकी या संवर्गातील कर्मचाऱ्यांना साप्ताहीक / शासकीय सुटटीच्या दिवशी केलेल्या कामाचा आर्थिक मोबदला मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन आदेश क्र. मबाआ-२००६/ प्र.क्र.१७८/ का-०७
३ रा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक :- १४ मार्च, २०११.

**प्रस्तावना** :- महिला व बाल विकास विभागातील जमादार/ वरिष्ठ काळजीवाहक/कनिष्ठ काळजीवाहक/वॉर्डबॉय / परिचर/ स्वयंपाकी ही गट- ड संवर्गातील पदे शासन अधिसूचना दि.१६.६.२००६ अन्वये अत्यावश्यक सेवेतील पदे म्हणून घोषित केलेली आहेत. विभागातील शासकीय संस्था मुलींचे / मुलांचे निरिक्षण गृहे, बालगृहे इ. मध्ये तीन शिपन्टमध्ये कर्मचाऱ्यांना काम करावे लागते. महाराष्ट्र राज्य परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे आणि संलग्न संस्था कर्मचारी सेवा नियम १९८५ मधील नियम ४३ नुसार आठवडयातून एक साप्ताहिक सुट्टी अनुज्ञेय आहे. अशा परिस्थितीत जेव्हा कर्मचाऱ्यांना साप्ताहीक सुट्टीच्या दिवशी किंवा शासकीय सुट्टीच्या दिवशी काम करावे लागते, तेव्हा त्या कर्मचाऱ्यांना साप्ताहीक /शासकीय सुटटीच्या दिवशी केलेल्या कामाचा आर्थिक मोबदला देण्याविषयीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- विभागातील शासकीय संस्था, बालगृहे, निरिक्षण गृहे इ. मध्ये कार्यरत असलेल्या १) जमादार/ वरिष्ठ काळजीवाहक/कनिष्ठ काळजीवाहक /वॉर्डबॉय/परिचर/ स्वयंपाकी यांना साप्ताहीक /शासकीय सुटटीच्या दिवशी काम करावे लागले तर त्याबद्दल त्यांना ते ज्या ठिकाणी काम करत असतील त्या ठिकाणी अनुज्ञेय असलेल्या दैनिक भत्याच्या रक्कमेइतका मोबदला देण्यात यावा.

तथापि दुसऱ्या व चौथ्या शनिवारी जमादार / वरिष्ठ काळजीवाहक / कनिष्ठ काळजीवाहक/ वॉर्डबॉय/ परिचर/ स्वयंपाकी यांनी काम केल्यास त्यांना वरीलप्रमाणे मोबदला अनुज्ञेय राहणार नाही.

२) जमादार/वरिष्ठ काळजीवाहक/कनिष्ठ काळजीवाहक/वॉर्डबॉय/परिचर/ स्वयंपाकी यांना त्यांच्या नेहमीच्या एका पाळीचे काम संपल्यावर दुसऱ्या पाळीमध्ये काम करावे लागले तर त्यांना खालीलप्रमाणे मोबदला देण्यात यावा.

| नेहमीच्या पाळीनंतर जास्त काम करावे लागलेला कालावधी / तास | द्यावयाचा मोबदला |
|---|---|
| आठ तास किंवा त्यांच्यापेक्षा जास्त | ते ज्या ठिकाणी काम करतात त्या ठिकाणी अनुज्ञेय असलेल्या दैनिक भत्त्याच्या ५०% इतकी रक्कम |
| चार तासापेक्षा जास्त परंतू आठ तासापेक्षा कमी | ते ज्या ठिकाणी काम करतात त्या ठिकाणी अनुज्ञेय असलेल्या दैनिक भत्त्याच्या ३०% इतकी रक्कम. |

३. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७३०/ १०/ व्यय-६, दि. २ डिसेंबर, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०११०३०५११०५४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(ज. कि. मगरे)
शासनाचे सह सचिव

प्रति,

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
४) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) नागपूर./ मुंबई
५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
६) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६)मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती, का-७.